सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत पात्र लाभार्थ्यांना साखर वितरीत करण्यासाठी ई-लिलाव तिमाही पध्दतीने आयोजित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : साखर-१११७/प्र.क्र.९१/नापु-१९ ,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २५ जुलै, २०१७.

**पहावे** :- १. शासन निर्णय क्रमांक: साखर-२०१३/प्र.क्र.१३१ (i)/नापु-१९, दि. ०२.११.२०१३
२. शासन निर्णय क्रमांक: साखर-२०१४/प्र.क्र.७७/नापु-१९, दि. १९.६.२०१४
३. शासन निर्णय क्रमांक : साखर-२०१४/प्र.क्र.१२३/नापु-१९ , दि. १७.१२.२०१४.
४. शासन शुध्दीपत्रक क्रमांक : साखर-२०१४/प्र.क्र.१२३/नापु-१९ , दि. २२.७. २०१६
५. शासन निर्णय क्रमांक : साखर-१११६/प्र.क्र.६९/नापु-१९, दि.११.४.२०१७.
६. शासन शुध्दीपत्रक क्रमांक : साखर-१११६/प्र.क्र.६९/नापु-१९, दि.१५.४.२०१७.
७. केंद्र शासनाचे दिनांक १२.५.२०१७ रोजीचे पत्र.
८. केंद्र शासनाच्या दिनांक ०१ जून, २०१७ रोजीच्या मार्गदर्शक सूचना.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने साखर कारखान्यांवरील नियंत्रण मे, २०१३ पासून हटविले आहे. केंद्रशासनाच्या आदेशानुसार सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत साखर वितरीत करण्यासाठी राज्यामध्ये ई निविदा नुसार खुल्या बाजारातून साखर खरेदी करण्याचा निर्णय दिनांक १३ ऑक्टोबर, २०१३ रोजी झालेल्या मंत्रीमंडळच्या बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार त्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २/११/२०१३ रोजी निर्गमीत करण्यात आला. ई निविदेत मुदतवाढ देऊनही प्रतिसाद मिळाला नाही. दरम्यानच्या कालावधीत एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंज या कंपनीने सादर केलेल्या प्रस्तावावर विचार करुन प्रायोगिक तत्वावर जुलै २०१४ ते डिसेंबर २०१४ या ६ माहिन्याच्या कालावधीसाठी एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंजमार्फत ई-लिलावद्वारे विहीत अटी व शर्तीनुसार साखर खरेदीचा शासन निर्णय दिनांक १९ जून, २०१४ रोजी निर्गमीत केला. ई- लिलावाद्वारे शासन निर्णयातील अटी शर्तीनुसार साखर खरेदी करण्यात आली. साखर खरेदीच्या सदर पद्धतीमुळे पारदर्शक, आधुनिक व बाजारभावाच्या तुलनेत कमी दरात शासनास साखर उपलब्ध होत असल्यामुळे दिनांक २७/११/२०१४ रोजी झालेल्या मंत्रीपरिषदेच्या बैठकीत एनसीडीईएक्स स्पॉट एक्सचेंज यांचेमार्फत ई लिलावाद्वारे साखर खरेदीची सदर पद्धत पुढे चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला. त्याबाबतचा शासन निर्णय दिनांक १७/१२/२०१४ रोजी निर्गमीत करण्यात आला. सदर शासन निर्णयानुसार नियमितपणे ई-लिलावाद्वारे साखर खरेदी करण्यात येत आहे.

केंद्र शासनाच्या दिनांक ०१ जून, २०१७ रोजीच्या मार्गदर्शक सूचनेनुसार आता राज्यातील अंत्योदय शिधापत्रिका लाभार्थ्यांना प्रतिमहा प्रति कुंटूब १ किलो साखर वितरीत करावयाची आहे. त्यामुळे साखरेचे नियमित नियतन फारच कमी झाले आहे व गोदामात जागा शिल्लक आहे. साखरेचे नियतन कमी झाल्यामुळे पुरवठादारांकडून ई-लिलावात बाजारभावापेक्षा जास्त दर प्राप्त होत आहेत. या सर्व बाबींचा विचार करता तीन महिन्यासाठी एकदाच ई- लिलाव घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एनसीडीईएक्स ई- मार्केटस् लि. कडून ई-लिलाव दरमहा घेण्याऐवजी यापुढे दर तीन महिन्याकरिता एकदाच ई-लिलाव घेण्यात येईल. या ई-लिलावासाठीच्या अटी व शर्ती आणि कराराचे प्रारुप दि. १९ जून, २०१४ व दिनांक १७ डिसेंबर, २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणेच राहतील.

सदर तिमाही ई-लिलाव ज्या तीन महिन्यासाठी घेण्यात येईल. त्याच्या मागील महिन्याच्या पहिल्या आठवड्यात ई-लिलावाची कार्यवाही पूर्ण करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०७२५१५००५६९३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Mhase Patil

Digitally signed by Swati Mhase Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9198652167706abf1515cbb7ffd9d0de8f0f145686cf64167e880e92001565b4, cn=Swati Mhase Patil
Date: 2017.07.25 15:07:57 +05'30'

**(स्वाती म्हसे-पाटील)**
सह सचिव,
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव.
६. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव.
७. मा. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
८. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग.
९. सर्व प्रशासकीय विभागप्रमुख.
१०.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) , महाराष्ट्र, मुंबई

११.महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, मुंबई
१३.महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, नागपूर
१४.सर्व विभागीय आयुक्त,
१५.सर्व जिल्हाधिकारी,
१६.नियंत्रक, वैधमापनशास्त्र, मुंबई,
१७.नियंत्रक, शिधावाटप, मुंबई,
१८. संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई,
१९.उप संचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
२०.वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
२१.सर्व उपायुक्त पुरवठा,
२२.सर्व अपर जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळता),
२३.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२४.अन्नधान्य वितरण अधिकारी, पुणे/नागपूर/सोलापूर,
२५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२९.विभागातील सर्व अधिकारी (सचिव वगळता),
३०. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई,
३१.वित्त विभाग (व्यय-४/ विनियम कार्यासन),
३२.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३३.निवड नस्ती, नापु-१९.